**विधि व न्याय विभागामधील विधि विधान शाखेमधील कार्यरत अधिकाऱ्यांसाठी "प्रशिक्षण धोरण २०२४ " ला प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: प्रशिक्षण-३५२३/प्र.क्र.४६/२३/२-अ**
दिनांक : २६ जुलै, २०२४

**संदर्भ :** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि.२३.०९.२०११

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२३ सप्टेंबर,२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण ठरविण्यात आलेले आहे. सदर शासन निर्णयामधील परिच्छेद २.३ मध्ये नमूद प्रशासनिक व सेवांतर्गत प्रशिक्षण सर्व पदावरील अधिकारी व कर्मचारी यांना अनिवार्य करण्यात आले आहे. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०२.०२.२०२२ रोजीच्या अधिसूचनेत राज्य प्रशिक्षण धोरणानुसार सेवेच्या विविध टप्प्यावर विहित केलेले कालबद्ध प्रशिक्षण प्रत्येक शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यास विहित कालावधीत पूर्ण करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र संबंधित कार्यालयास सादर करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णयामध्ये मुद्दा क्र.२.२ येथे तांत्रिक प्रशिक्षणाविषयी तरतूद आहे. त्यानुसार तांत्रिक प्रशिक्षणाची रचना व अंमलबजावणीचा आराखडा संबंधित विभागाच्या आणि त्या विभागाच्या अधिनस्त संस्थांच्या मूळ तांत्रिक कामकाजाशी संबंधित असेल. तांत्रिक प्रशिक्षणाची आखणी, विकसन, नियोजन, समन्वय, अंमलबजावणी तसेच प्रशिक्षणार्थींचे मूल्यमापन करुन त्यांना प्रमाणित करण्याची जबाबदारी प्रत्येक विभाग आणि त्यांच्या अस्तित्वात असलेल्या प्रशिक्षण संस्थांची राहील. बदलीने नियुक्ती झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या कामाचे स्वरुपानुसार काम करण्यासाठी विशिष्ट ज्ञानाची आवश्यकता असल्यास, अशा अधिकाऱ्यांना विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील प्रशिक्षण संस्थांमध्ये सक्तीने प्रशिक्षण देणे अनिवार्य आहे. संबंधित विभागांनी तांत्रिक प्रशिक्षण कार्यक्रमासाठी वार्षिक प्रशिक्षण आराखडा तयार करुन खर्चाची तरतूद करावी, अशी तरतूद आहे.

विधि व न्याय विभागाच्या विधि विधान शाखेच्या कामाचे स्वरुप आणि संवर्ग संरचना ही इतर मंत्रालयीन विभागांहून वेगळी आहे, म्हणून, विधि विधान ("ब"शाखा) शाखेत केल्या जाणाऱ्या कामानुसार आणि अधिकाऱ्यांच्या आवश्यकतेनुसार प्रशिक्षण धोरण तयार करणे आवश्यक आहे. तसेच, सन २०२२-२०२३ मधील KRA मध्ये ब शाखेमधील अधिकारी यांच्याकरिता प्रशिक्षण धोरण तयार करण्याचे उद्दिष्ट निर्धारीत करण्यात आलेले होते. सदर उद्दिष्ट पूर्ती करण्याच्या अनुषंगाने व विधि विधान शाखेमधील ("ब"शाखा) कामकाज व उपरोक्त सामान्य प्रशासन विभागाच्या तरतूदी लक्षात घेता, विधि व न्याय विभागामधील विधि विधान शाखा "ब"शाखा मधील कार्यरत अधिकाऱ्यांचे प्रशिक्षण धोरण ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

विधि व न्याय विभागामधील विधि विधान शाखा ("ब"शाखा ) मधील कार्यरत अधिका-यांकरीता "प्रशिक्षण धोरण २०२४" पुढीलप्रमाणे आहे.

## ०२. विधि विधान शाखेतील अधिकाऱ्यांकरिता प्रशिक्षण धोरण

### १. पार्श्वभूमी -

सामान्य प्रशासन विभागाने शासकीय कर्मचाऱ्यांसाठी महाराष्ट्र शासकीय कर्मचारी (कालबध्द प्रशिक्षण) नियम, २०२२ अन्वये, सर्वसाधारण प्रशिक्षण धोरण तयार केले आहे. विधि व न्याय विभागाच्या विधि विधान शाखेच्या कामाचे स्वरूप आणि संवर्ग संरचना ही, इतर मंत्रालयीन विभागाहून वेगळी आहे, म्हणून, विधि व न्याय विभागातील विधि विधान शाखेच्या अधिकाऱ्यांकरिता वेगळे प्रशिक्षण धोरण तयार करणे आवश्यक आहे.

विधि व न्याय विभागाची विधिविधान शाखा ही, अधिकारी अभिमुख (Officer Oriented) शाखा आहे. विधि विधान शाखेतील संवर्गातील अधिकाऱ्यांची बदली होत नाही. या शाखेमध्ये एकूण २३ मंजूर पदे आहेत.

विधि विधान शाखा ही शासनाचे विधि विधान विषयक (Legislation) व दुय्यम विधि विधान विषयक (Subordinate Legislation) मंत्रालयीन विभागांकडून येणारी कामे करणारी, विधि व न्याय विभागाची एक विशेषीकृत शाखा आहे. विधेयकांचे व अध्यादेशांचे प्रारूप तयार करणे, अधिनियमित करावयाच्या कायद्यांची व्यवहार्यता तपासणे, सांविधिक नियम, अधिसूचना व आदेश इत्यादींचे कायदेशीरदृष्टया तपासणी करणे, सांविधानिक आणि इतर कायदेशीर बाबींची तपासणी करणे, अशी मूलभूत कामे विधि विधान शाखेत केली जातात.

विधि विधान शाखेत कोणतेही प्रशासकीय कामकाज होत नाही. मंत्रालयीन विभागांनी पाठविलेल्या नस्त्यांवर या शाखेत काम करण्यात येते. विधि विधान शाखा ही शासनास सेवा देणारी शाखा आहे; त्यामुळे, शासनाचे सर्वसाधारण प्रशिक्षण धोरण, विधि व न्याय विभागाच्या विधि विधान शाखेतील अधिकाऱ्यांना लागू केले जाऊ शकत नाही. म्हणून, विधि विधान शाखेत केल्या जाणाऱ्या कामानुसार आणि अधिकाऱ्यांच्या आवश्यकतेनुसार प्रशिक्षण धोरण तयार करण्यात आले आहे.

### २. <u>शासनात विधि विधान शाखेची भूमिका</u>-

महाराष्ट्र राज्य हे कायदे करण्यामध्ये अग्रेसर राज्य आहे. कायदे करणे, हे कार्यरत शासनाचे धोरण स्पष्टपणे मांडणाऱ्या प्रमुख साधनांपैकी एक साधन आहे. विधि विधान शाखा, शासन आणि विधानमंडळ या दोन्हींमधील एक दुवा आहे. विधि विधान शाखा, कायदे करणे, अधिसूचना, नियम, आदेश निर्गमित करणे यांद्वारे शासनाची ध्येय धोरणे पूर्ण करण्यामध्ये महत्त्वपूर्ण भूमिका बजावते.

मंत्रालयीन विभाग, वैधानिक प्रस्तावांची कायदेशीर व सांविधिक व्यवहार्यता तपासण्यासाठी आणि विधेयकांचे व अध्यादेशांचे प्रारूप तयार करण्यासाठी विधि व न्याय विभागाकडे असे वैधानिक प्रस्ताव पाठवितात. विधि विधान शाखेचे काम हे तांत्रिक स्वरुपाचे आहे; म्हणून उक्त काम हे इतर प्रशासकीय विभागांच्या कामांपेक्षा पूर्णत: वेगळे आहे.

### ३. <u>प्रशिक्षणाची उद्दिष्टे</u>-

विधेयकांचे/अध्यादेशांचे, नियमांचे प्रारूप तयार करणे ही केवळ एक कला नसून ते एक शिस्तबद्ध काम आहे. विधेयकांचे/अध्यादेशांचे, नियमांचे प्रारूप तयार करण्यासाठी नैपुण्याची आवश्यकता असते. विधेयकांचे/अध्यादेशांचे, नियमांचे प्रारूप तयार करण्यातील अभियोग्यता व कौशल्य विकसित करण्यासाठी अधिकाऱ्यांना उजळणी व प्रशिक्षणाची गरज असते. या प्रशिक्षणाची प्रयोजने पुढीलप्रमाणे आहेत :-

(क) नवीन कौशल्ये आत्मसात करणे, सतत नवीन ज्ञान मिळवणे आणि अधिक चांगले काम करणे;

(ख) कौशल्ये व ज्ञान वृद्धिंगत करणे/त्यात सुधारणा करणे;

(ग) कार्यक्षमतेत वाढ करणे;

(घ) विधि विधान (विधेयके/अध्यादेश) यांचे प्रारूप तयार करणे या विषयातील तज्ज्ञांसोबत विचारांची व अनुभवांची देवाणघेवाण करणे;

(ङ) विधि विधानाचे परिनिरीक्षण अधिक परिणामकारकपणे कसे करावे, ते समजून घेणे;

(च) विधि विधानाचे प्रारूप तयार करण्यासाठी प्रभावीपणे विचारविनिमय विकसित करणे;

(छ) चांगले विधि विधान प्रारूप (Legislative Drafting) तयार करण्याची मुख्य तत्त्वे विकसित करणे;

(ज) अधिकाऱ्यांची तांत्रिक क्षमता व कौशल्ये यांचे बळकटीकरण करणे;

(झ) अधिकाऱ्यांना, जलद अध्ययनासाठी व बदलत्या परिस्थितीनुरुप आवश्यक बदल स्वीकारणे, त्यासोबत जुळवून घेणे आणि त्याचे व्यवस्थापन करणे यासाठी सहाय्य करणे;

(ञ) अधिकाऱ्यांच्या कामाप्रती असलेल्या दृष्टिकोनामध्ये बदल करणे;

(ट) माहिती सामायिक करणे आणि चांगल्या पद्धतींना चालना देणे;

(ठ) काम आणि निर्णायक परिस्थिती हाताळण्यासाठी कल्पना सुचवणे;

(ड) अधिकाऱ्यांचा कामाप्रती सकारात्मक दृष्टीकोन विकसित करणे;

(ढ) अधिकाऱ्यांच्या व्यक्तिमत्वाचा विकास करणे.

४. <u>व्याप्ती</u>-

विधि विधान प्रारूप (विधेयके/अध्यादेश/नियम) तयार करणे, हे विशेषीकृत काम असून त्यात प्रारूप तयार करण्याचे कौशल्य व नैपुण्य याची आवश्यकता असते. विधि विधान प्रारुप तयार करण्यासाठी निपुणता, अनुभव, कामातील समर्पण आणि प्रशिक्षित व तज्ज्ञ प्रारुपकारांची उपलब्धता आवश्यक असते. विधिविधानाचे प्रारूप तयार करणे ही अत्यंत तांत्रिक, गुंतागुंतीची आणि वेळखाऊ प्रक्रिया आहे. कायद्याचे ज्ञान असलेली एखादी व्यक्ती विधि विधानाचे प्रारुप तयार करण्याच्या प्रत्यक्ष अनुभवाशिवाय सक्षम प्रारुपकार बनू शकत नाही. विधि विधान प्रारूप हे विधिविषयक प्रारुपाहून भिन्न आहे.

विधि विधान शाखेतील काम कोठेही शिकवण्यात येत नाही. अनुभव व सेवांतर्गत प्रशिक्षण याद्वारे अधिकारी विधि विधान प्रारुप तयार करण्यामध्ये तज्ज्ञ बनतात. म्हणून, त्यांना एक तर विधि विधान शाखेतील सेवानिवृत्त अधिकाऱ्यांद्वारे किंवा या शाखेतील वरिष्ठ अधिकाऱ्यांद्वारे किंवा विधि क्षेत्रातील विधि तज्ज्ञांद्वारे व्याख्याने देऊन किंवा प्रत्यक्ष अनुभवाद्वारे (कामाचे) प्रशिक्षण दिले जाऊ शकते. प्रारुप तयार करण्याच्या उत्तम पद्धतींची माहिती होण्यासाठी, विधि विधान प्रारूप तयार करणारे आणि दुय्यम विधिविधान या क्षेत्रातील विधि अधिकाऱ्यांसोबत संवाद साधण्यासाठी इतर राज्यांना भेटी देणे देखील आवश्यक आहे.

५. <u>प्रशिक्षण कालावधी</u>-

एका वर्षात राज्य विधानमंडळाची किमान तीन अधिवेशने होतात. या अधिवेशनापूर्वी, अधिकारी हे विधि विधानाचे प्रारुप तयार करण्यात व त्या अनुषंगाने विधानमंडळाशी संबंधीत कामात व्यस्त असतात. दोन अधिवेशनादरम्यान सन्माननीय राज्यपाल महोदयांद्वारे अध्यादेश देखील प्रख्यापित करण्यात येतात. अध्यादेशांचे काम हे तात्काळ करावे लागते. मंत्रालयामध्ये ३० पेक्षा अधिक विभाग आहेत, मंत्रालयीन सर्व विभाग, सर्व दुय्यम विधि विधानाच्या नस्त्या प्रारूपे तपासण्यासाठी व विधेयकांची/अध्यादेशांची प्रारूपे तपासण्यासाठी विधिदृष्टया विधि विधान शाखेकडे पाठवतात. या शाखेत येणारी सर्व कामे ही तात्काळ

स्वरुपाची असतात. म्हणून या शाखेतील अधिकारी संपूर्ण वर्षभर विधेयके, अध्यादेश व इतर दुय्यम विधि विधान यांच्याशी संबंधित कामांमध्ये व्यस्त असतात. विधि विधान शाखेतील कामाचे स्वरुप आणि अधिकाऱ्यांचे संख्याबळ विचारात घेता, प्रशिक्षणाकरिता विशिष्ट वेळापत्रक विहित करणे शक्य नाही म्हणून, प्रशिक्षण सत्रे अधिकाऱ्यांच्या उपलब्ध वेळेनुसार आणि आवश्यकतांनुसार आयोजित करण्यात येतील.

**६. प्रशिक्षण प्रकार -**

**६.१ सेवांतर्गत प्रशिक्षण -**

वरिष्ठ अधिकारी कनिष्ठ अधिकाऱ्यांना विधि विधान व दुय्यम विधि विधानाचे प्रारूप तयार करण्याचे काम नेमून देतील. वरिष्ठ अधिकारी सर्व प्रारूपांचे परिनिरीक्षण (छानन्री) करतील आणि कनिष्ठ अधिकाऱ्यांना मार्गदर्शन करतील.

**६.२ व्याख्यानांचे आयोजन -**

(१) अधिकाऱ्यांच्या क्षमताबांधणीसाठी वेगवेगळ्या विषयांवर/प्रकरणांवर (प्रत्यक्ष किंवा दूरस्थ प्रशिक्षण/दूरदृश्य प्रणाली ) व्याख्यान्यांचे आयोजन करण्यात येईल. व्याख्याने पुढील व्यक्तींकडून आयोजित करण्यात येतील :-

(एक) विधिविधान शाखेचे सेवानिवृत्त अधिकारी,

(दोन) शाखेचे वरिष्ठ अधिकारी,

(तीन) विधि क्षेत्रातील तज्ञ,

(चार) प्रारूप तयार करणारे इतर राज्यातील तज्ञ,

(पाच) विधायी विभाग, भारत सरकार इ. येथील प्रारूप तयार करण्यातील तज्ञ,

(सहा) महाराष्ट्र राज्य विधान मंडळातील अधिकारी,

(सात) विशेष विषयातील तज्ञ.

(२) व्याख्यात्यांना प्रति व्याख्यान रुपये दोन हजार ते रुपये पाच हजार पर्यंत मानधन देण्यात येईल. (खर्चाची बाब असल्याने वित्त विभागाच्या मान्यतेने मंजूर करण्यात येईल.)

**६.३ इतर राज्यांना भेटी -**

(१) इतर राज्यांनी विधि विधान व दुय्यम विधि विधानाचे प्रारुप तयार करण्यासाठी अंगीकारलेल्या पद्धतींची माहिती घेण्यासाठी अधिकाऱ्यांचा एक गट इतर राज्यांना भेट देईल. इतर राज्यांना भेटी देण्याचा हेतू असा आहे की, इतर राज्यांतील प्रत्यक्ष कामकाजाची कार्यपद्धती जाणून घेणे, तेथील वरिष्ठ अधिकाऱ्यांसोबत संवाद साधणे, कामाच्या कल्पना/कार्यपद्धती आणि माहिती यांचे आदानप्रदान करणे, प्रारुप तयार करण्यातील अंगिकारलेल्या सर्वोत्तम (पद्धतींचा) अभ्यास करणे, इतर राज्यांनी अधिनियमित केलेल्या कायद्यांचा अभ्यास करणे, इत्यादी.

(२) इतर राज्यांमध्ये प्रशिक्षण घेण्यासाठी पाठविलेले अधिकारी यांचा प्रवास खर्च तसेच निवास खर्च (हॉटेलमध्ये राहण्याच्या खर्चासह) व भोजनाचा खर्च यांची प्रतिपूर्ती आवश्यक ती कागदपत्रे सादर केल्यानंतर वित्त विभागाच्या सहमतीने वेळोवेळी काढलेल्या शासन निर्णयानुसार किंवा शासन आदेशानुसार अधिकाऱ्यांना देय असेल.

**६.४ विदेशातील प्रशिक्षण -**

विदेशातील प्रशिक्षणामुळे प्रशिक्षण पद्धतीतील पोकळी भरून काढता येते. या प्रशिक्षणामुळे अधिकाऱ्यांना जगातील काही अग्रणी संस्थामधील विभिन्न विषयांवरील नवीनतम विचार जाणून घेण्याची संधी मिळते. यामुळे अधिकाऱ्यांना विविध देशांच्या विकास व प्रशासनाची विभिन्न पध्दती अनुभवता येतात आणि सर्वोत्तम पद्धतीपर्यंत पोहोचता येते.

तथापि, महाराष्ट्र राज्याच्या दि.२३.०९.२०२४ रोजीच्या प्रशिक्षण धोरणामध्ये विदेश प्रशिक्षण धोरण मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील राज्य प्रशिक्षण कृती दल ठरवेल अशी तरतूद आहे. सद्यस्थितीत कोणत्याही संवर्गासाठी विदेश प्रशिक्षण धोरण ठरविण्यात आलेले नाही. त्यामुळे सद्यस्थितीत सदर प्रशिक्षणाचा प्रकार लागू राहणार नाही. तथापि, यापूढे सामान्य प्रशासन विभाग यांनी विदेश प्रशिक्षणाबाबत धोरण ठरविल्यास किंवा याबाबत कोणतेही निर्देश दिल्यास त्याप्रमाणे विदेशातील प्रशिक्षण लागू राहील. मात्र त्या त्या वेळेस त्याकरीता संबंधित विभाग/प्राधिकारी यांची मान्यता आवश्यक राहील.

**७. निधी देणे -**

विधि व न्याय विभाग, प्रशिक्षण खर्चासाठी पुरेशी अर्थसंकल्पीय तरतूद करील आणि विधि विधान शाखेच्या अधिकाऱ्यांना प्रशिक्षणासाठी निधी उपलब्ध करून देईल.

**८. मूल्यमापन -**

वर्ष अखेरीस, अधिकारी, सचिव (विधि विधान) यांना अहवाल सादर करतील. सचिव (विधि विधान), अधिकाऱ्यांच्या प्रगतीचे मूल्यमापन करतील.

<u>विधि विधान शाखेतील अधिकाऱ्यांसाठी प्रशिक्षण धोरण विषय</u>

**विधि विधान शाखेतील अधिकाऱ्यांसाठी प्रशिक्षण धोरण**

१. सामान्य प्रशासन विभागाद्वारे आयोजित यशदा, पुणे यांचे सर्वसाधारण मूलभूत प्रशिक्षण कनिष्ठ प्रारुपकार आणि सहायक प्रारुपकार-नि-अवर सचिव यांना देण्यात येईल.

२. कनिष्ठ प्रारुपकार, सहायक प्रारुपकार-नि-अवर सचिव आणि उप प्रारुपकार-नि-उपसचिव हे विधि व न्याय मंत्रालय, विधायी विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली यांचा विधि विधान प्रारुप तयार करण्याचा मूलभूत पाठयक्रम पूर्ण करतील.

३. सर्व अधिकाऱ्यांकरिता पुढील विषयांवर आवश्यकतेनुसार व्याख्यानांचे आयोजन करण्यात येईल. विधिविधान शाखेचे सेवानिवृत्त अधिकारी किंवा या विषयाचे ज्ञान असलेल्या विख्यात व्यक्ती यांना व्याख्यानासाठी निमंत्रित करण्यात येईल किंवा विधि व न्याय विभागाच्या विधिविधान शाखेचे वरिष्ठ अधिकारी पुढील विषयांवर व्याख्याने देतील:-

(क) विधि विधान शाखेत चालणाऱ्या कामाशी निगडीत मूलभूत माहिती.

(ख) विधि विधान आणि दुय्यम विधिविधान कामे हाताळण्याची तंत्रे.

(ग) दुय्यम विधि विधानाची मूलभूत तत्त्वे आणि दुय्यम विधि विधानाचे प्रारुप तयार करण्यासाठीची मार्गदर्शक तत्त्वे.

(घ) मुख्य विधि विधान व सुधारित विधि विधानाचे प्रारुप तयार करण्याची मूलभूत तत्त्वे.

(ङ) विधेयक तयार करण्याच्या प्रक्रियेचे टप्पे व राज्य विधानमंडळामध्ये विधेयक पारित करण्याची कार्यपद्धती.

(च) अध्यादेश प्रक्रियेची कार्यपद्धती आणि अध्यादेशाचे विधेयकात रूपांतरण.

(छ) अधिनियमाची संरचना (अधिनियमांचे मूलभूत भाग).

(ज) संविधानांतर्गत वैधानिक अधिकार (संविधानातील महत्त्वाचे अनुच्छेद व सातवी अनुसूची).

(झ) विधेयक व अध्यादेशाशी संबंधित सांविधानिक तरतुदी.

(ञ) मूलभूत हक्क आणि मार्गदर्शक तत्त्वे.

(ट) विधिविधानाचे प्रारुप तयार करण्यातील प्रारुपकारांची भूमिका आणि प्रारुप तयार करण्यासाठी व प्रारूपकारांसाठी, सर्वसाधारण मार्गदशक तत्त्वे.

(ठ) सोपविलेले वैधानिक अधिकार, त्याची प्रक्रिया आणि मर्यादा.

(ड) संविधिचे प्रारुप तयार करण्याची व तिची अर्थउकल करण्याची संबंधित कायदेशीर तत्त्वे.

(ढ) प्रारुप तयार करण्याची आदर्श पद्धती.

(ण) इतर राज्यांमध्ये व देशांमध्ये प्रारुप तयार करण्याच्या पाठ्यक्रमांना व प्रशिक्षणांना उपस्थित राहणे.

(त) महत्त्वाच्या कायदेशीर मुद्यांवर आणि कायद्यांतील बदलांवर किंवा न्यायालयीन न्यायनिर्णयांवर गटचर्चा.

४. विधि विधान कामाशी संबंधित संवाद साधण्यासाठी आणि ज्ञानाची देवाणघेवाण करण्यासाठी इतर राज्यांना भेटी.(मुद्दा क्र.६.३ नुसार)

५. विधिविधानाचे प्रारुप तयार करण्यासाठी विदेशातील प्रशिक्षण (मुद्दा क्र.६.४ नुसार)

०३. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग अनौ.सं.क्र. ०२/२०२४, दिनांक १०.०४.२०२४, वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३४४६/व्यय-५ दिनांक ०५.०६.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीने व शासन मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०७२६१४४६४५७६१२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DAGADU KHEDEKAR

Digitally signed by SANJAY DAGADU KHEDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a53701d2758331055dd3c46d615f8367912b1c64cd218e709c1b4de20bdf4f85, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F754D4BA6FE8F00C0E15635F0F58C9242CEAD19994FE32A6EBE261A0E4B1874C, cn=SANJAY DAGADU KHEDEKAR
Date: 2024.07.26 15:05:26 +05'30'

**( सं.द.खेडेकर )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई
६. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव(विधि विधान), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
११. महासंचालक,यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी,राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
१२. उप सचिव, व्यय-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उप सचिव,प्रशि-४/का-१२-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. सर्व कार्यासने/शाखा, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवडनस्ती/२-अ